**लातूर, व परभणी जिल्हा परिषदेतील कनिष्ठ अभियंता यांचे सहायक या पदावरील पुनर्नियुक्ती देण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांची नियुक्तीपासून ते पुनर्नियुक्ती पर्यंतच्या कालावधीतील सेवासातत्य देण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
**शासन निर्णय क्र. न्यायप्र.२०११/प्र.क्र.२५८-अ/आस्था-१०,**
बांधकाम भवन,२५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २४ फेब्रुवारी, २०२३

**संदर्भ :-** (१) शासन निर्णय ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.एपीटी २६९८/सीआर १२७०/१३, दिनांक २७/०७/२०००.
(२) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्र. न्यायप्र.२०११/प्र.क्र.२५८-अ/आस्था-१०, दिनांक २५.०५.२०२२

**प्रस्तावना :-** उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये जिल्हा परिषद परभणी येथील ९ कनिष्ठ अभियंता यांच्या सहायकांना त्यांनी केलेल्या चार वर्षांच्या सवेचा अनुभव विचारात घेऊन त्यांच्या बाबतीत सहानुभूतीचा दृष्टीकोन ठेवून पुनर्नियुक्ती देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. तथापि, या शासन निर्णयातील पुनर्नियुक्तीच्या अट क्र.४ नुसार सदर नियुक्ती ज्या दिवसापासून देण्यात येईल, ती नियुक्ती पूर्णत: नवीन असेल असे नमूद करण्यात आले आहे.

या संदर्भात संबंधित कर्मचाऱ्यांपैकी श्री. मारूती विठ्ठलराव बोबडे व अन्य तसेच श्री. प्रभाकर श्रीपती भवाळ यांनी मा. उच्च न्यायालय मुंबई यांचे औरंगाबाद खंडपीठ येथे रिट याचिका क्र.४६७४/२०११ व ४६७५/२०११ दाखल केल्या होत्या. याचिकाकर्ता ज्या अटी-शर्तीवर जिल्हा परिषद परभणी येथे कार्यरत होते त्याच अटी- शर्तीवर जिल्हा परिषद जालना व औरंगाबाद येथे कार्यरत असलेल्या अन्य कनिष्ठ अभियंत्यांचे सहायक यांना सेवा सातत्याचा लाभ देण्यात आला आहे. परंतू या याचिकर्त्यांच्या सह नियमित नियुक्ती देण्यात आलेल्या

अनुक्रमे (१) श्री. जेउरकर भास्कर केशवराव, कनिष्ठ अभियंता, जिल्हा परिषद परभणी व (२) श्री. शेख अल्लाउद्दीन नबीसाब, कनिष्ठ अभियंता, जिल्हा परिषद लातुर यांना वरील संदर्भ क्र.२ मधील आदेशानुसार उपरोक्त लाभ देण्यात आलेला नाही. अन्य जिल्हा परिषदांमधील कर्मचाऱ्यांप्रमाणे सेवा सातत्य मिळण्याबाबत याचिकाकर्ता यांनी निवेदन सादर केल्यास याचिकाकर्ता यांना अन्य समकक्ष कनिष्ठ अभियंत्यांचे सहायक यांच्याप्रमाणे सेवासातत्य देण्याबाबत शासनाने विचारपूर्वक ६ महिन्यांच्या आत निर्णय घ्यावा, असे आदेश मा. उच्च न्यायालयाने रिट याचिका क्र.४६७४/२०११ व ४६७५/२०११ मध्ये दिनांक २२/०२/२०१७ रोजी दिले आहेत. सदर कर्मचारी हे वर्ग-३ चे कर्मचारी असल्याने व त्यांना करण्यात आलेल्या अतिप्रदानामध्ये ते प्रत्यक्ष दोषी नसल्याने त्यांचेकडून अतिप्रदानाची कोणतीही वसूली करण्यात येवू नये, असेही मा. न्यायालयाने आदेशात स्पष्ट केले आहे.

मा. न्यायालयाच्या उपरोक्त आदेशानुसार याचिकाकर्ता यांना शासनाकडे दिनांक ०३/०७/२०१७ रोजी निवेदन सादर केले आहे. त्यानुषंगाने संबंधित अर्जदार यांनी दिनांक २३.०८.२०२२ रोजी शासनाकडे निवेदन सादर केलेले आहे. मा. न्यायालयाच्या आदेशानुसार या निवेदनावर निर्णय घेणे आवश्यक असल्याने याबाबतचा सविस्तर प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावाचा सर्वांकष विचार करून त्यानुषंगाने शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

मा. उच्च न्यायालय मुंबई यांचे औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल रिट याचिका क्र.४६७४/२०११ व ४६७५/२०११ मधील आदेश विचारात घेता संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक २७/०७/२००० मधील अट क्र.४ रद्द करून उपरोक्त याचिकेतील याचिकाकर्ता यांच्याप्रमाणे खालील कर्मचाऱ्यांना त्यांच्या मूळ नियुक्तीपासून ते पुनर्नियुक्तीपर्यंतच्या कालावधीतील सर्व सेवा प्रयोजनार्थ सेवासातत्य देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१. श्री. जेउरकर भास्कर केशवराव, कनिष्ठ अभियंता, जिल्हा परिषद परभणी व

२. श्री. शेख अल्लाउद्दीन नबी साहब, कनिष्ठ अभियंता, जिल्हा परिषद लातुर

**०२.** शासनाच्या वरील निर्णयानुसार संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी त्यांच्या स्तरावर विहीत कार्यपद्धतीनुसार आवश्यक ती कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक क्रमांक २०२३०२२४१६५३३८९१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्टाचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SURESH DEORAM AMBEKAR

Digitally signed by SURESH DEORAM AMBEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=296e3c880fd1b089cf7bc9aed875e1bd95a2e8ed913596c74f7aa9e24917bc3c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2768FD72EB50BA92D164687191D6F9C7C412A486DDA9C76BBD82BD2EB7012517, cn=SURESH DEORAM AMBEKAR
Date: 2023.02.27 13:00:59 +05'30'

**( सुरेश आंबेकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.

२)मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३) मा. मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव

४) मा. राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव

५) मा. विधानसभा / विधानपरिषद यांचे सर्व सदस्य

६) अतिरीक्त मुख्य सचिव (ग्रामविकास व पंचायत राज)

७) सर्व उप सचिव/ सह सचिव (ग्राम विकास विभाग)

८) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद

९) उपायुक्त (आस्थापना), औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.

१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद लातूर.

११) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद परभणी.

१२) निवडनस्ती (आस्था-१०), ग्रामविकास विभाग.